**(जयपूर येथील राजमहालात ११ जून १९७१ रोजी एका विशेष कार्यक्रमात इस्लामचा परिचय करण्याच्या हेतुस्तव हा निबंध सादर करण्यात आला. या कार्यक्रमात मोठमोठे विद्वान सामील होते व खुद्द राजमाता गायत्री देवी उपस्थित होत्या.)**

आदरणीय सभापती महोदय,

मानणीय राजमाता आणि बांधवांनो!

अत्यंत प्रशंसनीय आणि बऱ्याच प्रकारे अनुकरणीय आहे की माननीय राजमातांनी त्यांचे पती मा. जयपूरनरेश महाराजाधिराज सवाई १००८ मा. मानसिंहजी यांच्या पुण्यतिथीच्या मुहूर्तावर सर्वधर्मिय संमेलन व विभिन्न संप्रदायांच्या विद्वानांच्या प्रवचनांचे आयोजन केले. अशा प्रकारे राजमाता जयपूर यांनी एकीकडे आपल्या पती महोदयाप्रति आपल्या प्रेमाचे दर्शन घडविले तर दुसरीकडे एक भारतीय नारी असल्याच्या नात्याने आपल्या विशालहृदयतेची ओळखदेखील करून दिली. याचा संबंध विविध मतप्रणाली आणि संप्रदायांना समान दृष्टीने पाहण्याबरोबर आहे. जीवनास वास्तविक आणि व्यापक दृष्टीने पाहण्याचे हे कार्य निश्चितच अत्यंत प्रशंसनीय आहे.

याप्रसंगी इतर धर्म, आणि मतप्रणालीबरोबरच इस्लामसंबंधीनासुद्धा विचार मांडण्याचा आदेश मिळाला असून ही गोष्ट माझ्याकरिता अत्यंत सौभाग्याची आहे. 'इस्लाम काय आहे?' या विषयावर आज मी अत्यंत थोडक्यात प्रकाश टाकण्याचा प्रयत्न करणार आहे.

## इस्लामचा उद्देश

बंधुनो,

आपल्या भारतात इस्लामला जेवढी प्रसिद्धी मिळाली तितकेच त्यास समजण्याचे प्रयत्न कमी झाले. इस्लामविषयी विभिन्न पैलूंनी विचार करता येतो, केलाही जातो. मात्र ही गोष्ट विसरली जाते की इस्लामचा प्रत्येक पैलू परस्पर संबंधित असून कोणत्याही पैलूचा स्वतंत्ररित्या अभ्यास करणे शक्य नाही. याचा एक विशेष पैलू असा आहे की आपल्या व्यक्तित्वाच्या पूर्णत्वाचेच दुसरे नाव इस्लाम आहे. कुरआनाच्या अध्ययनातून एक विशेष ईशनियम स्पष्ट

होतो की ‘वस्तूचा निर्मितीउद्देश आणि उद्दिष्टाकडे अग्रेसर होत राहणे.’ या नियमांतर्गत सर्व वस्तू आपले लक्ष्य वा उद्दिष्ट गाठतात व या अंतर्गतच परिपूर्णतेचे स्वरूप प्राप्त करतात आणि दोष, त्रुटींपासून मुक्त होतात. कुरआनात या नियमाचा उल्लेख या शब्दांत करण्यात आला आहे,

“आमचा पालकर्ता तो आहे ज्याने प्रत्येक वस्तूला तिचे स्वरूप प्रदान केले मग तिला मार्ग दाखविला.” (दिव्य कुरआन, २०:५०)

सृष्टीमध्ये प्रत्येक वस्तूला जे जडणघडण, आकार, स्वरूप, रंग-रूप, गुणधर्म तसेच वैशिष्ट्य मिळालेले आहे, ते मुळात ईश्वराचीच देणगी होय. ईश्वरच प्रत्येकास मार्गदर्शन करतो, योग्य वाट दाखवितो, प्रत्येकास खरी दिशा दाखवितो, दिशानिर्देशकाचा पूर्ण बंदोबस्त करतो. चिमण्यांना ईश्वराने केवळ पंखच दिले नसून आकाशात उडण्याचे कौशल्यसुद्धा शिकविले. माशांना पोहणे आणि मधमाशांना मध गोळा करणेदेखील त्यानेच शिकविले.

जर ईश्वराने मार्गदर्शन दिले नसते तर जगातील कोणतीही वस्तू स्वतःचा निर्मितीउद्देश पूर्ण करू शकली नसती. अशा अपूर्णतेच्या अवस्थेत बागेत फुले टवटवलीच नसती, पृथ्वीवर हिरवळ आलीच नसती, फुलांत सुगंध दरवळला नसता, कोकिळेच्या कंठी कर्णमधूर आवाज आलाच नसता.

या विशेष नियमाकडे कुरआनाने आणखीन एके ठिकाणी या शब्दांत अंगुलीनिर्देश केला आहे,

“(हे पैगंबर (स.)) आपल्या उच्चतर पालनकर्त्याच्या नावाचे पावित्र्यगान करा ज्याने निर्माण केले व प्रमाणबद्धता प्रस्थापित केली. ज्याने भाग्य बनविले मग मार्ग दाखविला, ज्याने वनस्पती उगविल्या, मग त्यांना काळा केरकचरा बनवून टाकला.” (दिव्य कुरआन, ८७:१-५)

अर्थात ईश्वराने केवळ निर्मितीच केली नसून चांगले स्वरूप प्रदान केले आणि याबरोबरच केवळ सुंदर आकार व गुणधर्मच दिले नसून उद्देश आणि लक्ष्य गाठण्याचा खरा मार्गसुद्धा दाखविला. आपण पाहतो की भूतलावर ईश्वर वैरण आणि गवत उगवितो आणि मग त्याच्या ज्या पात्रता आणि क्षमता असतात, त्या विकसित होण्याचा पूर्ण बंदोबस्तसुद्धा करतो. मग आपण हेसुद्धा पाहतो की छोटे-छोटे आणि कोमल अंकुर वाढून ते गर्द, हिरवेगार आणि मोहक स्वरूप प्राप्त करतात.

## इस्लामचा अर्थ

ही समस्त सृष्टी आणि ईश्वराच्या याच व्यापक नियमाच्या अंतर्गत असून 'मानव'देखील यास मुळीच अपवाद नाही. ईश्वराने मानवास केवळ रचले नसून त्यास अस्तित्व प्रदान करून उद्देशसुद्धा सांगितला. त्याने मानवास योग्य मार्गाचे ज्ञान दिले, ज्या मार्गावर चालून तो आपला वास्तविक उद्देश पूर्ण करू शकतो आणि आपल्या जीवनास पूर्णत्वाचे स्वरूप प्रदान करू शकतो, हेच मार्गदर्शन आणि याचे अनुसरण व पालन करण्याचे नाव अरबी भाषेत 'इस्लाम' होय.

'ईशइच्छेचे पालन आणि त्याच्या योजनेनुसार आचरणकरून त्याचे फलित पाहण्याची कामना करणे' ही इस्लामची परिभाषा होय. ईश्वराची इच्छा, सत्य, मंगल आणि सुंदर असून यानुसारच मानवाची रचना करण्यात आलेली आहे. ईशइच्छा आणि त्याचे नियोजन कसे व कोणते आणि कशा स्वरूपाचे आहे, हे पाहण्यासाठी आपल्याला इतरत्र कोठेही जाण्याची गरज नसून स्वत: मानवाच्या अस्तित्वातच याचे पूर्णपणे दर्शन घडते. दुसऱ्या शब्दांत ईश्वराला आपल्याकडून जे हवे आहे तोच आपला स्वभाव होय. हीच बाब कुरआनाने अशा शब्दांत व्यक्त केली आहे,

"सर्वश्रेष्ठ अल्लाहने मानवजातीला निर्माण केले आहे. अल्लाहने केलेली रचना बदलली जाऊ शकत नाही, हाच अगदी रास्त आणि योग्य धर्म आहे परंतु बहुतेक लोक जाणत नाहीत." (दिव्य कुरआन, ३०:३०)

अर्थात इस्लाम धर्म हा मनुष्याचा स्वभावधर्म होय. हा धर्म आपल्या स्वभावाविरूद्ध मुळीच नाही. इस्लामचे ज्ञान मुळात आपल्या स्वभावधर्म अगर प्रवृत्तीचेच ज्ञान आहे. शिवाय आपल्या प्रवृत्तीविरूद्ध जाणे हे आपल्या निर्मळ स्वरूपास नष्ट करणे आहे. हीच गोष्ट अंतिम पैगंबर मुहम्मद (स.) यांनी अशा शब्दांत व्यक्त केली आहे,

"प्रत्येक मूल हे मानवप्रवृत्तीवरच जन्म घेत असते. (बहुतेक वेळा ज्याचे आई-बाप त्याला या प्रवृत्तीपासून दूर नेतात.)"

मग हीच गोष्ट आणखीन जास्त स्पष्ट करताना म्हटले आहे,

"हे अगदी अशा प्रकारेच होते, जणू एखाद्या प्राण्याच्या पोटी परिपूर्ण

स्वरूपाचा प्राणी जन्म घेतो. कोणतेही मूल कान कापलेल्या अवस्थेत जन्म घेत नसून नंतर लोक अंधश्रद्धेपोटी त्याचे कान कापतात.''

या उदाहरणावरून स्पष्ट होते की आपल्या स्वभावानुसार असलेला आणि ईश्वराने नेमून दिलेला धर्म त्यागून मनुष्य स्वत:च्या व्यक्तित्वाला आघात पोचवितो.

## मानवाचा कोमल अवयव

मानवाचा सर्वांत जास्त कोमल अवयव त्याचे हृदय होय. मानवास स्वभावत: वाटते त्याने जीवनात ती पद्धत अंगीकारावी जिच्यामुळे या अतिकोमल आणि मधुरतम अवयवाचे रक्षण व्हावे. इस्लामची वास्तविकता आणि त्याचे मूळ तत्त्व समजून घेतल्यानंतर यावर पूर्णपणे विश्वास होतो की इस्लाम हा मानवाचा स्वभावधर्म असल्यामुळे आपली ही इच्छा त्याचकडून पूर्ण होऊ शकते. केवळ इस्लामच आपल्या सर्वांत जास्त कोमल अवयवाचे, मधुर भावनांचे रक्षण करू शकतो, त्यांना विकसित आणि परिपूर्ण करू शकतो. कुरआनात या तथ्यावर स्पष्टपणे प्रकाश टाकण्यात आला आहे,

"खचितच सफल झाला तो ज्याने अंत:करणाची शुद्धी केली आणि विफल झाला तो ज्याने त्याला दाबून टाकले.'' (दिव्य कुरआन, ९१:९-१०)

## पाकळ्या विखरू नयेत

इस्लाम हा मानवाच्या व्यक्तित्व आणि त्याच्या कोमलतम पक्षांचा रक्षक असून त्यांना विकसित होण्याची पूर्ण संधी उपलब्ध करून देतो. यातच त्याची सार्थकता आणि अस्तित्वदेखील आहे. इस्लाम हा ईशइच्छांचे पालन होय. ही अतिशय साधारणशी बाब वाटते, मात्र यातच जीवनाचे पूर्ण रहस्य आणि गूढ सामावलेले आहे. जीवनाची वास्तविकता, सुंदरता आणि महानता खरे पाहता यावरच अवलंबून आहे. या सरळ आणि सहज गोष्टीचा विसर पडला तर मात्र जीवनरूपी पुष्पाच्या या पाकळ्या विखरून जातील. एकात्मतेचा आधार देणारी कोणतीही बाब अस्तित्वात राहणार नाही. हे प्रचंड विश्व एकाच सूत्रात बांधणारे कोणतेही शुभदर्शक तत्त्व राहणार नाही की या प्रचंड विश्वातील विभिन्नतेत ऐक्याचे शुभदर्शन घडणार नाही. अशा प्रकारे इस्लाम मन आणि मनोवृत्तीचा सूक्ष्म, नाजूक आणि अतिशय मधुर व्यवहार असून

याची दिशा जेव्हा ईश्वराकडे वळते तेव्हा त्यांस ईश्वराचे आदरयुक्त भय, ईशप्रेम, दास्यभाव, आत्मसमर्पण, आदेशानुपालन वगैरे नावांनी अभिव्यंजित करण्यात येते आणि जेव्हा याची दिशा मानव आणि प्राण्याकडे वळते, तेव्हा प्रेमभाव, बंधुत्व, लोकसेवा, परोपकार, दयाभाव वगैरे नावे देण्यात येतात. इस्लाम जीवनाची वास्तविक व्याख्या, जीवनाचे वास्तव आणि जीवनाची सुंदर अशी अनुभूती तसेच मधुरतम क्रिया होय. जीवनाचा एखादा कोरडाठाक आणि रटाळ पक्ष मुळीच नसून जीवनाच्या वास्तविकतेचा अतिरसाळ रसास्वाद, जीवनाची प्रफुल्लता आणि चैतन्य होय.

याशिवाय हेदेखील विसरता कामा नये की इस्लाम केवळ मनाच्या सूक्ष्म आणि मधूर व्यापाराच्या चौकटीत अडकून राहात नसून स्वभावत: व्यक्तीचे संपूर्ण जीवन, समाजाचे प्रत्येक अंग आणि याहीपेक्षा संपूर्ण मानवतेस पूर्णपणे आपल्या छत्रछायेत घेतो. मानवी जीवनाचा कोणताही पैलू यापासून बाहेर अथवा वंचित राहू शकत नाही. म्हणून इस्लामने जीवनाच्या समस्त प्रकरणात मानवाचे परिपूर्ण मार्गदर्शन केले आहे. अगदी विचार आणि धारणा ते नैतिक, सामाजिक, आर्थिक, राजकीय आणि आध्यात्मिक सर्वच क्षेत्रांत तो यशाचा मार्ग दाखवितो. इस्लाम दाखवितो की व्यक्ती आणि समाजाचा विकास कसा करावा? आदर्श समाजाची रूपरेखा काय आहे? समाजात लोकांचे परस्पर संबंध कसे असावेत? आर्थिक प्रणाली संतुलित आणि न्यायसंगत कशी असू शकते? कशा प्रकारे माणूस हा माणूस बनू शकतो, समस्त मानवांत समता व बंधुत्वाची भावना निर्माण करण्याची कोणती गुरुकिल्ली आहे? समस्त मानव समान, आपसांत बंधु आणि एकाच ईश्वराचे दास व एकाच पित्याची संतान कशी आहेत. मग हेदेखील स्पष्ट केले की राज्यव्यवस्था कशी असावी? शासन हे व्यवस्थित आणि न्यायानुकुल चालविण्यासाठी कोणते विधान व प्रणाली मानवासाठी योग्य व कोणती अन्यायी आहे? समाजात न्यायाची स्थापना कशी होऊ शकते? मानवांना संघटित करण्याचा आधार काय? यांसारख्या समस्त समस्यांविषयी इस्लामने स्पष्टपणे प्रकाश टाकला असून अशा प्रकारे इस्लाम म्हणजे एक परिपूर्ण जीवनव्यवस्थेच्या स्वरूपात आपल्यासमोर येतो.

## मौलिक धारणा

इस्लामच्या तीन मौलिक धारणा असून तो मानवास एकाच ईश्वराचे आवाहन करतो. इस्लामने सर्वप्रथम हे स्पष्ट केले की हे ब्रह्मांड स्वत:हून निर्माण झालेले नसून याचा निर्माता, रचयिता आहे. तोच या जगाचा चालक, नियंत्रक, स्वामी व प्रभु असून त्याच्या सामर्थ्य व कौशल्याचे दर्शन या विश्वाच्या प्रत्येक कणात होते. ब्रह्मांडाच्या विविध रूपात त्याची दया, करुणा, सामर्थ्य आणि शक्तीचे स्पष्ट दर्शन होते. कागदावर कळत नकळत आणि हेतू वा विचाराशिवाय रेघोट्या ओढल्याने कविता निर्माण होत नाही, एखादी रचनाबद्ध कथाही तयार होत नाही. मग हे कसे शक्य आहे की बुद्धी, ज्ञान, आणि सामर्थ्य असलेल्या ईश्वराशिवाय आपोआपच हे प्रचंड आणि अतिविलक्षण असे ब्रह्मांड अस्तित्वात यावे ज्यात प्रत्येक कार्य आश्चर्यजनक रितीने व व्यवस्थित, सुरळीतपणे सुरू आहे.

## तो एकटाच आहे!

आणखीन एक बाब अशी की ईश्वर दोन अगर दोनपेक्षा जास्त असू शकत नाहीत. दोन अथवा अधिक ईश्वरांना स्वीकारण्याचा अर्थ असा होतो की, कोणत्याही ईश्वरात अपार व परिपूर्ण सामर्थ्य नाही. अशा अवस्थेत सत्ता आणि शक्ती विभागलेली असते. तो परिपूर्ण, सर्वगुणसंपन्न असणे आवश्यक आहे. तो अमर आहे, अविनाशी आहे. सत्ता आणि सामर्थ्याच्या विभाजनाने त्याच्या परिपूर्णत्वाचा आवश्यक गुणधर्म आणि निर्मितीसामर्थ्य नष्ट होते, निरर्थक ठरते. म्हणूनच केवळ एकेश्वरत्ववादाची धारणा सत्य असल्याचे सिद्ध होते.

## मार्गदर्शन

इस्लामची दुसरी मुख्य धारणा ही पैगंबरत्व अर्थात ईशदूतत्व होय. या भूतलावर मानवाने पहिले पाऊल ठेवले तेव्हापासून ईश्वराने त्याच्या मार्गदर्शनाची पूर्ण व्यवस्था केली आणि या उद्दिष्टपूर्ततेसाठी त्याने पैगंबरांना पाठविले. पैगंबरांना या गोष्टीची जबाबदारी दिली की त्यांनी मानवजातीस जीवनाचे लक्ष्य दाखवावे. ईश्वराने प्रदान केलेली जीवनपद्धती दाखवावी. जीवनासाठी ईशप्रदत्त नियम आणि कायदे मानवजातीस प्रदान करावे. याकरिता ईश्वराने मानवजातीच्या मार्गदर्शनासाठी आपल्या पैगंबरांवर ग्रंथ अवतरित केले. हे पैगंबर विविध

भूभाग, देश आणि काळांत पाठविण्यात आले. या समस्त पैगंबरांचा संदेश काळानुरूप आणि देशानुरूप वेगवेगळ्या भाषेत असला तरी हा ईशसंदेश एकच होता. लोकांनी अज्ञानवश त्यांचा विरोधसुद्धा केला, त्यांच्या पश्चात त्यांच्या शिकवणीत बिघाड निर्माण केले, त्यांचे चारित्र्य डागाळण्याचा प्रयत्न केला. पण ईश्वराने नेहमीच दुसरा पैगंबर पाठवून सत्यासत्याचा फरक लोकांना स्पष्ट करून दाखविला.

पूर्ण जग एक होण्याची परिस्थिती निर्माण होईपर्यंत पैगंबरांची अवतरणशृंखला सुरूच राहिली. दळणवळणाची साधने वगैरेंच्या माध्यमाने जवळच्या काळात भविष्यामध्ये संपूर्ण विश्व एक होण्याची संभावना निर्माण झाल्यानंतर ईश्वराने पैगंबर पाठविणे बंद केले आणि सर्वांत शेवटी पैगंबर मुहम्मद (स.) यांच्याकरवी ही घोषणा करण्यात आली की यानंतर आता पैगंबर पाठविण्यात येणार नाही. त्याने पैगंबर मुहम्मद (स.) यांच्यावर अंतिम ग्रंथ - कुरआन अवतरला हा ग्रंथ समस्त मानवजातीकरिता मार्गदर्शन असून ईश्वराने याच्या पूर्ण हमी आणि वचन दिले ईश्वराचे हे वचन अटळ आहे.

आज कोणी कुरआनच्या शिकवणींचे पालन करो अथवा न करो, मात्र कुरआनात बदल वा परिवर्तन करण्याचे सामर्थ्य कोणालाच नाही. ईशमार्गदर्शन अर्थात इस्लाम आजही कुरआन आणि पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या आदर्श जीवनचरित्राच्या स्वरूपात असून जगाच्या अंतापर्यंत सुरक्षित व अबाधित राहणार. यावरून हेच स्पष्ट होते की इस्लामचा इतिहास पैगंबर मुहम्मद (स.) यांच्यापासून सुरू होत नसून जगाच्या प्रारंभापासून होतो.

कुरआन हा अंतिम ग्रंथ असून हा एखादा नवीन ग्रंथ नाही. तसेच त्याच्या शिकवणी मौलिक रूपातही नवीन नाहीत. तर मागील सर्वच ईशग्रंथांची केवळ अंतिम आवृत्ती होय. हेच कारण आहे की ईश्वराने कुरआनास 'मुहैमिन' अर्थात 'संरक्षक' अशी उपाधी दिली आहे. (दिव्य कुरआन, ५:४८) याचा अर्थच होतो की पूर्वीच्या समस्त ईशग्रंथांचा संरक्षक आणि त्यांतील शिकवणींची पुष्टी करणारा तसेच त्यातील शिकवणी विशुद्ध स्वरुपात मानवजातीसमोर सादर करण्याचा कार्यभार सांभाळणारा आहे.

कुरआनद्वारे सादर करण्यात आलेला इस्लाम धर्म हा कोण्या विशिष्ट जातीकरिता आयात केलेला धर्म नसून सनातन आणि वास्तविक धर्म आहे.

हा सनातन धर्म लोक विसरून गेले अथवा कालचक्रात त्याचे स्वरूप बदलून गेले आहे. म्हणून तर यातील शिकवणी आपण भारतवासीयांकरिता मुळीच नवीन नाहीत. ज्या सत्याचे प्रतिपादनाचे करतो, त्याचे चिन्ह वा अवशेष कोणत्या न कोणत्या स्वरूपात येथील ग्रंथांत आणि परंपरेत आढळतात. कुरआन सत्य आणि असत्याची कसोटी असून या प्रमाणावर आधारित खरे आणि खोटे आपण ओळखू शकतो. मग याच्याद्वारे स्पष्ट जीवनपद्धत आणि प्रणाली, जी ईश्वरदत्त आहे, आपल्याला प्राप्त होते.

मागे आपण पाहिले आहे की इस्लामचा इतिहास हा जगाच्या प्रारंभापासून असून सर्व मानवजातीसाठी ईश्वराने निर्धारित केलेला धर्म 'इस्लाम' होय. फरक एवढाच की विविध भाषांनुसार नावे वेगवेगळी असतीलही, मात्र याचा इतिहास त्याच्यादेखील पूर्वीपासून आहे हे जाणवते. इस्लामचा आत्मा आणि स्वभावधर्म म्हणजे आज्ञापालन होय.

हे आज्ञापालन ज्या प्रकारे जीवनाच्या त्या भागात स्वभावतः आहे, ज्यास आपण जीवनाचा नैसर्गिक भाग म्हणतो, अंतर्गत आपल्या छातीत हृदय धडधडते आणि आपली फुप्फुसे श्वास घेतात, आपली जीभ बोलण्याचे कार्य करते तसेच ईशआज्ञांचे पालन जीवनाच्या त्या भागातदेखील अपेक्षित आहे, जेथे मानव स्वातंत्र्याची अनुभूती घेतो, अर्थात विचार, कल्पना, आचरण आणि कर्म वगैरे क्षेत्रांत त्याने कोणती नीती आणि मार्ग अवलंबावा? ही समस्या खऱ्या अर्थाने आज माणसाला प्रचंड भेडसावत आहे. इस्लाम समस्येचे परिपूर्ण समाधान करून जीवनाच्या या क्षेत्रात मानवास ईश्वराचा आज्ञाकारी बनवून या समस्येचे पूर्णतः समाधान करणे म्हणजेच इस्लाम होय. ईशआज्ञा व आदेशांचे ज्ञान त्यास पैगंबरांद्वारे प्राप्त होईल आणि प्रामाणिक व परिपूर्ण ईशआदेश ईश्वराचे पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या शिकवणीत आणि ईश्वराकडून सादर करण्यात आलेल्या ग्रंथात म्हणजेच कुरआनात आहेत.

नैसर्गिक क्षेत्रात ब्रह्मांडाच्या सर्वच वस्तू ईशआज्ञांचे पालन करीत आहेत, तेही त्यांना अस्तित्व मिळाल्यापासून! एवढेच नव्हे तर त्यांना मिळालेले अस्तित्वसुद्धा ईशआदेशानेच प्राप्त झालेले आहे. आपल्या आणि पूर्ण विश्वातील सर्व वस्तूंच्या अस्तित्वाचे मूलतत्त्व आदेशानुवर्तन आणि आत्मसमर्पणामध्ये आहे. अस्तित्वाच्या संभावनेमध्ये ईशयोजनेचे पालन नसते

तर कोणत्याही वस्तूचा समावेश शक्यच नसता. सृष्टीच्या योजनेमागे कोणत्याही प्रकारचा अनिष्ट व वाईट उद्देश असण्याची कल्पनादेखील करणे शक्य नाही. तर उलट यामागे अत्यंत उन्नत व श्रेष्ठतम उद्देश कार्यरत आहे. हे म्हटलेसुद्धा गेले आहे की "आनंदाद्येव सर्वानि भूतानि जायन्ते।" अर्थात प्रत्येक वस्तूची उत्पत्ती आनंदमय उद्देशाने होत असते. या अनुषंगाने इस्लामचा इतिहास विश्वाशी संलग्न आहे.

सत्य धर्मातच जीवनाचे सौंदर्य अनुभवता येऊ शकते. सत्य धर्म ही मानवाची केवळ कर्मसाधना नसून सौंदर्यसाधनादेखील असते.

True sweet hearting leads to true religion.

अर्थात सत्य आणि मधूर हृदय हे सत्य धर्माकडे घेऊन जाते.

## परलोकत्व

इस्लामची तिसऱ्या क्रमांकाची मुख्य धारणा परलोकत्व अर्थात मृत्यूनंतरचे जीवन होय. याचा अर्थ असा की मृत्यूनंतर मानवास पुन्हा जीवंत करण्यात येईल. परलोक-जीवनाच्या धारणेशिवाय हे विश्व आणि संपूर्ण ब्रह्मांड खेळ-तमाशाच ठरते. फुलाच्या जीवनाचा अभिप्राय वा लक्ष्य केवळ एवढ्यामुळेच पूर्ण होते की त्याने उमलावे, फुलावे, बहरावे आणि सुगंध देऊन परत धुळीस मिळावे. मात्र मानवाचे असे मुळीच नाही. कारण मानवाला निव्वळ भौतिक अस्तित्व नसून आत्मिक अस्तित्वदेखील आहे.

माणूस नेहमीच अशा गोष्टींची स्वप्ने पाहतो ज्या कायमस्वरूपी असाव्यात. त्यास कधीही न संपणारे सुखी व समाधानी जीवन हवेहवेसे वाटते. त्यास ईशदर्शनाची ओढ असते. तो कधीही नष्ट न पावण्यासारखा ईश्वराशी संपर्क साधू इच्छितो. तो आपले हृदय ज्या ईशअनुरागाने तृप्त करतो, त्याचा रसास्वाद नेहमीकरिता त्यास हवासा वाटतो. याचप्रमाणे त्यास आपल्या गत प्रियजनांना भेटावेसे वाटते. त्यास ब्रह्मांड आणि जीवनाचे रहस्य डोळ्यांनी पाहण्याची तीव्र इच्छा असते. त्यास वाटते की या जीवनात ज्यांच्यावर अन्याय झाला, त्यांना न्याय मिळावा आणि अन्यायी, अत्याचारीजनांना शिक्षा मिळावी. अत्याचारपीडितांची फिर्याद ऐकण्यात यावी. सत्यप्रिय लोकांची आणि ईश्वराची मस्करी करणाऱ्यांना शिक्षा मिळावी. त्यास वाटत असते की,

सत्यप्रिय आज्ञाधारक लोकांना त्यांच्या कर्मांचे पुरस्कार मिळावेत आणि जर त्यांना जगात सन्मान व प्रतिष्ठा मिळाली नसेल तर ईश्वराने त्यांना सन्मानित व प्रतिष्ठित करावे.

## या जीवनात नव्हे तर त्या जीवनात

उपरोक्त इच्छा-आकांक्षा आणि मनोकामना या लौकिक जीवनात पूर्ण होणे शक्य नाही. याचे मुख्य कारण असे की हे जीवन केवळ परीक्षास्थळ असून हे त्या नियमांचे आणि सिद्धान्ताचे पालन करण्याचे स्थळ आहे, ज्याच्या परिणामस्वरूप पुढे येणाऱ्या लोकात (अर्थात परलोकात) आत्म्यांच्या अगर मानवांच्या विकासाचे व पूर्णतेचे प्रदर्शन शक्य होईल. परलोकी जीवनातच हे शक्य होईल. जे परीक्षा देणार नाहीत ते अनुत्तीर्ण होतील. पारलौकिक जीवनाचा अर्थच पुढील काळात येणारे जीवन असा होतो. जे मृत्यूनंतर येणार असून ते स्थायी स्वरूपात असेल. पारलौकिक जीवनाचा वर्तमान जीवनाशी नक्कीच संबंध असून ते याचेच परिणामस्वरूप आहे. विवेकी आणि उच्च आकांक्षा बाळगणारे लोक कोणत्याही वस्तूचा परिणाम त्याच्या वस्तुविशेषामध्ये ओळखतात. त्यांना प्रत्येक वस्तूमध्ये परिणाम, अंतिम स्वरूप आणि गतीची अनुभूती येते... हेच तथ्य कुरआनात अशा शब्दांत व्यक्त करण्यात आले आहे,

"आकाशांत व जमिनीत ती अत्यंत कठीण वेळ असेल, ती तुमच्यावर अकस्मात येईल. हे लोक त्यासंबंधी तुम्हाला अशाप्रकारे विचारतात जणूकाय तुम्ही तिच्या शोधात लागला आहात" (दिव्य कुरआन, ७:१८७)

खरी गोष्ट अशी की केवळ हेच वर्तमान जीवन सर्वकाही नसून मानवजीवनाचा प्रवास या जीवनात संपणार नाही. मृत्यू हे केवळ या प्रवासाची एक मजल असून मानव हा मुळात या वर्तमान जीवनाचा नव्हे तर पारलौकिक जीवनाचा वाटसरू आहे. पारलौकिक जीवन या जीवनापेक्षा विस्तृत आणि अमर्याद आहे. आपल्याला खऱ्या अर्थाने हवे असलेले जीवन आपल्याला मिळालेच कोठे? त्याची तर आतून निर्मिती होत असून या निर्माणकार्यात आपल्याला योगदान द्यावयाचे आहे. या जबाबदारीप्रति जर आपण सावधान नसलो तर याचे वाईट परिणाम भोगावे लागणार आणि त्यापासून आपल्याला कोणीही वाचवू शकणार नाही, हे निश्चित!

-०- समाप्त -०-